*"हिंदी मिडीयम" या हिंदी चित्रपटास करमणूक शुल्क माफी देण्याबाबत.*

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईएनटी- २०१७/प्र.क्र.८१/टी-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**तारीखः १८ मे, २०१७.**

वाचा :-

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. : ईएनटी-२०१४/प्र.क्र.३०७/टी-१, दि. १८.०२. २०१६.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. : ईएनटी-२०१४/प्र.क्र.३०७/टी-१, दि. २७.०३. २०१५.
३) श्री. भुषण कुमार, व्यवस्थापकीय संचालक, मे. सुपर कॅसेट्स प्रायव्हेट लिमिटेड, मुंबई यांचे दि. १५.०५.२०१७ चे पत्र.
४) चित्रपट सल्लागार समितीचा चित्रपट परिनिरिक्षणाबाबतचा दि.१७.०५.२०१७ चा अहवाल.

**प्रस्तावना :-**

भारताच्या उज्वल भवितव्यासाठी विद्यार्थ्यांकरीता मातृभाषेतील शिक्षणाचे असलेले महत्व तसेच शासकीय शाळांच्या पुनरुज्जिवनाची आवश्यकता यासारख्या शैक्षणिक व सामाजिक मूल्यांवर आधारित असलेल्या **"हिंदी मिडीयम "** या हिंदी चित्रपटास करमणूक शुल्क माफी देण्याबाबतची विनंती व्यवस्थापकीय संचालक, मे. सुपर कॅसेट्स प्रायव्हेट लिमिटेड, मुंबई यांनी संदर्भाधिन पत्रान्वये शासनास केली होती.

त्यानुषंगाने, महाराष्ट्र करमणूक शुल्क नियमावली, १९५८ मधील **नियम २४(१)** अन्वये गठीत करण्यात आलेल्या चित्रपट सल्लागार समितीच्या संदर्भाधीन अहवालास अनुलक्षून राज्य शासनास विशेष आदेशांद्वारे कोणत्याही **उच्च शैक्षणिक, सांस्कृतिक व सामाजिक मुल्य** दर्शविणाऱ्या चित्रपटास करमणूक शुल्क भरण्यापासून सूट देण्यासंबंधी महाराष्ट्र करमणूक शुल्क अधिनियमातील **कलम ६ (३)** अनुसार प्राप्त अधिकारांन्वये श्री. भुषण कुमार, श्री. क्रिशन कुमार आणि श्री. दिनेश विजन यांच्याद्वारे निर्मित व श्री. साकेत चौधरी यांच्याद्वारे दिग्दर्शित **"हिंदी मिडीयम"** हा हिंदी चित्रपट राज्यातील जास्तीत जास्त प्रेक्षकांपर्यंत पोहोचण्याकरिता सदर हिंदी चित्रपटास करमणूक शुल्क माफी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विद्यार्थ्यांकरीता मातृभाषेतील शिक्षणाचे असलेले महत्व; भारताच्या उज्वल भवितव्यासाठी श्रीमंत- गरीब, शिक्षित - अशिक्षित यासारख्या विविध सामाजिक स्तरातील पार्श्वभूमीमध्ये वाढणाऱ्या विद्यार्थ्यांमध्ये एकतेची व समानतेची भावना निर्माण होण्याकरीता त्यांना एकत्रितपणे द्यावयाच्या शिक्षणाचे महत्व; मुल्याआधारित शिक्षण व्यवस्था; शासकीय शाळांच्या पुनरुज्जिवनाची आवश्यकता तसेच शिक्षणाचा अधिकार (Right to Education) या शैक्षणिक धोरणाचा समाज परिवर्तणामध्ये असलेले महत्वाचे योगदान यासारख्या **शैक्षणिक व सामाजिक मूल्यांचे** महत्व प्रभाविपणे दर्शविण्यात

आलेल्या **"हिंदी मिडीयम"** या श्री. भुषण कुमार, श्री. क्रिशन कुमार आणि श्री. दिनेश विजन यांच्याद्वारे निर्मित व श्री. साकेत चौधरी यांच्याद्वारे दिग्दर्शित हिंदी चित्रपटास महाराष्ट्र करमणूक शुल्क अधिनियमातील **कलम ६ (३)** अन्वये राज्य शासनास प्राप्त अधिकारांनुसार या शासन निर्णयाच्या दिनांकापासून **सहा महिने** इतक्या कालावधीकरीता करमणूक शुल्क माफी प्रदान करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१७०५१८१४००५५९११९** असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Madhav Veer

Digitally signed by Madhav Veer
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b8bcafe4a890e79ceaf1ea38b990e1e22eda eda6d9d0b7d64088adc780cd25e6, cn=Madhav Veer
Date: 2017.06.02 14:58:49 +05'30'

**(डॉ. माधव वीर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अप्पर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग), मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (शालेय शिक्षण विभाग), मंत्रालय, मुंबई.
७. सचिव (महिला व बालकल्याण), मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (सामाजिक न्याय विभाग), मंत्रालय, मुंबई.
९. महासंचालक (माहिती व जनसंपर्क संचालनालय), मंत्रालय, मुंबई.
१०. श्री. विश्वास प्रभाकरराव वसेकर, (अशासकीय सदस्य), डी-२४, मंत्री हाईट्स, ४९५, शनिवार पेठ, पुणे-३०.
११. श्री. आशिष कुलकर्णी (अशासकीय सदस्य ), बी-११०१, ब्लॉसम बॉलेवॉर्ड, पिंगले फार्म्स, लेन क्र. ७, कोरेगाव पार्क, पुणे-११.
१२. श्रीमती रेणुका शहाणे (अशासकीय सदस्य), ३०३/बी, लिला अपार्टमेंट, गुलमोहर पार्क समोर, यारी रोड, वर्सोवा, अंधेरी (प.), मुंबई-६१.
१३. श्री. भुषण कुमार, व्यवस्थापकीय संचालक, मे. सुपर कॅसेट्स प्रायव्हेट लिमिटेड, प्लॉट नं. बी-३२, न्यु लिंक रोड, सिटी अंधेरी (पश्चिम), मुंबई- ४०० ०५३.
१४. उप सचिव (टी-१ कार्यासनाचे नियंत्रक अधिकारी), महसूल व वन विभाग , मंत्रालय, मुंबई.
१५. सर्व विभागीय आयुक्त.
१६. सर्व जिल्हाधिकारी.
१७. सर्व अपर जिल्हाधिकारी (करमणूक शुल्क), सर्व जिल्हे.
१८. प्रधान सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र -१, मुंबई.
२०. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
२१.निवड नस्ती, टी-१.